**कृषि विभागाच्या योजनांची महा-डीबीटी पोर्टलद्वारे अंमलबजावणी करण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**

**शासन परिपत्रक क्रमांक : संकीर्ण ०९१९/प्र.क्र.२२१/१४-अे,**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.

दिनांक : ०४ नोव्हेंबर, २०२०

**संदर्भ :**

१. सामान्य प्रशासन विभागाचा (माहिती व तंत्रज्ञान) शासन निर्णय क्र. GAD-मातंस-२०१८ / C.R. १३८ /S.१/ ३९ दि. १२/१०/२०१८

**प्रस्तावना:-**

शासनाच्या विविध कल्याणकारी योजनांची जलद गतीने व पारदर्शक पद्धतीने अंमलबजावणी करण्याकरिता तसेच, नागरिकांना सर्व शासकीय विभागांच्या विविध योजनांचा लाभ एकाच पोर्टलद्वारे देण्याच्या हेतूने शासनाने महाराष्ट्र माहिती व तंत्रज्ञान महामंडळामार्फत महा-डीबीटी पोर्टल विकसित केले आहे. सद्यस्थितीत, या पोर्टलवर महाविद्यालयीन विद्यार्थ्यांसाठी विविध विभागांच्या पोस्ट-मॅट्रिक शिष्यवृत्ती योजनांच्या अंमलबजावणीसाठी प्रणाली विकसित केलेली असून सदर योजनांची महा-डीबीटी पोर्टलद्वारे अंमलबजावणी करण्यात येत आहे.

कृषि विभागामार्फत शेतकऱ्यांशी निगडीत विविध योजनांची अंमलबजावणी करण्यात येत असून सदर योजनांचा लाभ घेण्यासाठी शेतकऱ्यांना प्रत्येक योजनेसाठी लेखी स्वरुपात स्वतंत्र अर्ज करावे लागत होते तसेच, काही योजनांसाठी संगणकीय प्रणालीवर स्वतंत्रपणे अर्ज करावे लागत होते. तथापि, अर्ज करण्यापासून ते प्रत्यक्ष लाभ मिळेपर्यंत एकात्मिक संगणकीय प्रणाली अस्तित्वात नव्हती. कृषि विभागाने आता महा-डीबीटी पोर्टलवर "शेतकरी योजना" या सदराखाली शेतकऱ्यांच्या सोयीकरिता सर्व योजनांचा लाभ "एकाच अर्जाद्वारे" देण्याच्या दृष्टिने अर्ज करण्यापासून ते प्रत्यक्ष लाभ मिळेपर्यंत एकात्मिक संगणकीय प्रणाली विकसित केलेली आहे. या प्रणालीद्वारे शेतकऱ्यांना त्यांच्या पसंतीच्या बाबींच्या निवडीचे स्वातंत्र्य देण्यात आले असून शेतकऱ्यांनी शेती निगडीत विविध बाबींकरिता अर्ज करावयाचा आहे. सदर बाबी ज्या योजनेतून देता येऊ शकतील त्या योजनांतर्गत पात्र शेतकऱ्यांची संगणकीय सोडत पद्धतीने निवड करण्यात येणार आहे. यामुळे, योजनांच्या अंमलबजावणीत पारदर्शकता येईल तसेच, राज्यात सर्व योजनांच्या अंमलबजावणीत एकसुत्रता येईल व वरिष्ठ स्तरावरून योजनांच्या अंमलबजावणीच्या प्रगतीचे प्रभावी संनियंत्रण करणे शक्य होणार आहे.

सन २०२०-२१ पासून कृषि विभागाच्या प्रमुख योजनांची अंमलबजावणी महा-डीबीटी पोर्टलद्वारे करण्यात येणार असून दि. ७ जुलै, २०२० रोजी मा. मुख्यमंत्री महोदयांच्या हस्ते या पोर्टलवर अर्ज स्वीकृतीचा शुभारंभ करण्यात आला आहे. चालू वर्षापासून महा-डीबीटी पोर्टलद्वारे योजनांच्या अंमलबजावणीबाबत पुढीलप्रमाणे कार्यवाही करावी.

**परिपत्रक :-**

१. सन २०२०-२१ पासून कृषि विभागाच्या योजनांची महा-डीबीटी पोर्टलद्वारे अंमलबजावणी सुरु करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. चालू वर्षी पासून कृषि विभागाच्या पुढील प्रमुख योजनांची महा-डीबीटी पोर्टलद्वारे अंमलबजावणी करावी आणि उर्वरित योजना टप्प्या-टप्प्याने कालबद्धरित्या या पोर्टलद्वारे राबविण्याचे नियोजन करावे.

| **अ.क्र.** | **योजनेचे नाव** |
|---|---|
| i. | प्रधानमंत्री कृषि सिंचन योजना - प्रती थेंब अधिक पिक (PMKSY-PDMC) |
| ii. | मुख्यमंत्री शाश्वत कृषि सिंचन योजना |
| iii. | कृषि यांत्रिकीकरण उप-अभियान (SMAM) |
| iv. | राज्य पुरस्कृत कृषि यांत्रिकीकरण योजना |
| v. | राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान-अन्नधान्य पिके (भात, गहू, कडधान्य, पोषक धान्य, भरडधान्य) (NFSM-Foodgrains) |
| vi. | राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान-तेलबिया पिके (NFSM-Oilseeds) |
| vii. | राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान-वाणिज्यिक पिके (कापूस व ऊस) (NFSM-Cash Crops) |
| viii. | एकात्मिक फलोत्पादन विकास अभियान (MIDH) |
| ix. | भाऊसाहेब फुंडकर फळबाग लागवड योजना |
| x. | बिरसा मुंडा कृषि क्रांती योजना (आदिवासी उप योजना क्षेत्रांतर्गत) |
| xi. | बिरसा मुंडा कृषि क्रांती योजना (आदिवासी उप योजना क्षेत्राबाहेरील) |
| xii. | डॉ. बाबासाहेब आंबेडकर कृषि स्वावलंबन योजना |
| xiii. | राष्ट्रीय कृषि विकास योजना-रफ्तार योजनेंतर्गत (RKVY-RAFTAAR) मंजूर होणारे कृषि विभागाचे विविध प्रकल्प |

३. परिच्छेद २ मधील तक्त्यातील अनु. क्र. x, xi व xii येथील योजना जिल्हा स्तरीय योजना (DPDC) असून त्यांचे कामकाज जिल्हा परिषदेच्या कृषि विभागामार्फत महा-डीबीटी पोर्टलवर करण्यात येईल. त्याकरिता, जिल्हा परिषदेच्या संबंधित अधिकारी / कर्मचाऱ्यांना योजनांचे कामकाज करण्यासाठी महा-डीबीटी पोर्टलवर लॉगीन आय. डी. व पासवर्ड उपलब्ध करून दिला जाईल.

४. कृषि विभागाच्या विविध योजनांचा लाभ घेण्याच्या दृष्टिने महा-डीबीटी पोर्टलमध्ये शेतकऱ्यांनी अर्ज सादर करण्याचे टप्पे पुढीलप्रमाणे आहेत:

## ४.१. अर्जदारांची नोंदणी व आधार प्रमाणीकरण:

सर्व इच्छुक शेतकऱ्यांना महा-डीबीटी पोर्टलच्या संकेतस्थळावर जाऊन स्वतःची नोंदणी करावी लागेल आणि आपल्या आधार क्रमांकाचे प्रमाणीकरण करणे बंधनकारक आहे तथापि, सदर प्रक्रिया शेतकऱ्यांना एकदाच करावी लागणार आहे.

| | |
|---|---|
| **संकेतस्थळ** | महा-डीबीटी पोर्टलचे https://mahadbtmahait.gov.in/ हे संकेतस्थळ आहे. या संकेतस्थळावरील **"शेतकरी योजना"** हा पर्याय निवडावा. शेतकरी स्वतःच्या मोबाईल, संगणक / लॅपटॉप / टॅबलेट, सामुदायिक सेवा केंद्र (CSC), ग्रामपंचायतीतील संग्राम केंद्र इ. माध्यमातून उक्त संकेतस्थळावर जाऊन अर्ज करू शकतील. |
| **अर्जदार नोंदणी** | अर्जदारांनी प्रथमतः वापरकर्त्याचे नाव (User name) व संकेतशब्द (Password) तयार करून घ्यावा व आपले खाते उघडावे (लॉगीन). तदनंतर पुन्हा लॉगीन करावे, अर्जदारांना "वैयक्तिक लाभार्थी" अथवा "शेतकरी गट / एफ.पी.ओ./संस्था" म्हणून नोंदणी करण्याचा पर्याय उपलब्ध असेल. अर्जदारांनी त्यांच्या इच्छेनुसार योग्य पर्याय निवडावा. महा-डीबीटी पोर्टलवर अर्ज करण्याबाबत सविस्तर माहिती User manual द्वारे दिली असून ते पोर्टलवर माहितीस्तव ठेवण्यात आलेले आहे. |
| **आधार क्रमांक प्रमाणीकरण** | "वैयक्तिक लाभार्थी" म्हणून नोंदणी करू इच्छिणाऱ्या सर्व शेतकऱ्यांना त्यांचा आधार क्रमांक सदर संकेतस्थळावर प्रमाणित करून घ्यावा लागेल. ज्या वापरकर्त्याकडे आधार क्रमांक नसेल त्यांनी प्रथम आधार नोंदणी केंद्राकडे जाऊन त्यांची नोंदणी करावी व सदर नोंदणी क्रमांक महा-डीबीटी पोर्टलमध्ये नमूद करून त्यांना योजनांसाठी अर्ज करता येईल. अशा अर्जदारांना अनुदान वितरीत करण्यापूर्वी महा-डीबीटी पोर्टलमध्ये त्यांना देण्यात येणारा आधार क्रमांक नोंदणीकृत करून प्रमाणित करून घ्यावा लागेल, त्याशिवाय त्यांना अनुदानाचे वितरण करण्यात येणार नाही. |

## ४.२. वैयक्तिक तपशील / गटाची माहिती (Profile) भरणे:

"वैयक्तिक लाभार्थी" म्हणून नोंदणी केलेल्या सर्व शेतकऱ्यांना प्रथमतः त्यांचा वैयक्तिक तपशील भरणे बंधनकारक आहे. या अंतर्गत अर्जदारांना वैयक्तिक माहिती, पत्ता व स्वतःच्या नावे असलेल्या शेत जमिनीचा तपशील सादर करावा लागेल. त्याचप्रमाणे, योजनांच्या आवश्यकतेनुसार पिकांचा तपशील, कुटुंबाचा तपशील, शेतावरील वीज उपलब्धता, सिंचन स्रोत इ. बाबींचा तपशील सादर करावा लागेल. या सदरामध्ये तारांकित (*) बाबींची माहिती देणे अनिवार्य असून सदर माहिती भरल्यानंतरच संबंधित लाभार्थ्यांच्या वैयक्तिक तपशीलास

अनुसरून ते विविध योजनांमधील ज्या बाबींना पात्र ठरत असतील त्या बाबींच्या निवडीसाठी त्यांना अर्ज करता येईल.

त्याचप्रमाणे, “शेतकरी गट / एफ.पी.ओ. /संस्था” म्हणून नोंदणी करण्याचा पर्याय निवडलेल्या अर्जदारांना त्यांच्या संस्थेची माहिती सादर करावी लागेल.

**४.३. कृषि विभागाच्या विविध बाबींना अर्ज करणे:**

कृषि विभागामार्फत राबविण्यात येणाऱ्या विविध योजनांतर्गत अनेक बाबींकरिता अर्थसहाय्य करण्यात येते. या प्रणालीद्वारे शेतकऱ्यांना एका अर्जाद्वारे सर्व योजनांसाठी अर्ज करण्याची सुविधा उपलब्ध करून देण्यात येत आहे. शेतकऱ्यांच्या सोयीसाठी सर्व योजनांसाठी पुढील सामायिक घटक विकसित केलेले आहेत:

| अ.क्र. | घटक | समाविष्ट बाबी |
|---|---|---|
| १. | **कृषि यांत्रिकीकरण** | ट्रॅक्टर, पॉवर टिलर, मनुष्य व बैल चलीत औजारे, स्वयंचलित यंत्र व औजारे, प्रक्रिया युनिट्स, ट्रॅक्टर व पॉवर टिलर चलीत यंत्र व औजारे, भाडे तत्वावर कृषि यंत्र व औजारे सेवा पुरवठा केंद्राची उभारणी इ. कृषि यंत्र व औजारे. |
| २. | **सिंचन साधने व सुविधा** | सूक्ष्म सिंचन (ठिबक व तुषार सिंचन), शेत तळे, शेत तळ्यास प्लास्टिक अस्तरीकरण, पाईप, पंपसेट, इंजिन इ. |
| ३. | **बियाणे, औषधे व खते** | विविध पिकांसाठी लागणारे प्रमाणित बियाणे, विविध औषधे आणि जैविक व रासायनिक खते इ. |
| ४. | **फलोत्पादन** | फळबाग लागवड, काढणी पश्चात व्यवस्थापन, रोपवाटिका, कांदा चाळ, संरक्षित शेती (हरित गृह, शेड नेट गृह), एकात्मिक शीत साखळी प्रकल्प, प्रक्रिया प्रकल्प इ. फलोत्पादन विषयक सर्व बाबी. |
| ५. | **अनुसूचित जाती व जमाती प्रवर्गातील शेतकऱ्यांसाठी विशेष योजना** | नवीन विहीर बांधणे, जुनी विहीर दुरुस्ती, इनवेल बोअरिंग, सूक्ष्म सिंचन (ठिबक व तुषार सिंचन), शेत तळ्यास प्लास्टिक अस्तरीकरण, पाईप, पंपसेट, इंजिन, परसबाग, वीज जोडणी आकार इ. [बिरसा मुंडा कृषि क्रांती योजना (आदिवासी उप योजना क्षेत्रांतर्गत व आदिवासी उप योजना क्षेत्राबाहेरील) आणि डॉ. बाबासाहेब आंबेडकर कृषि स्वावलंबन योजनेंतर्गत अनुज्ञेय बाबी] |

शेतकऱ्यांनी उपरोक्त प्रत्येक घटकांतर्गत उपलब्ध असलेल्या विविध बाबींपैकी आपल्या पसंतीच्या बाबींची निवड करून त्यांचा अर्जात समावेश करावयाचा आहे. अशाप्रकारे

सर्व बाबींची निवड पूर्ण झाल्यानंतर शेतकऱ्यांनी ऑनलाईन अर्ज सादर करावयाचा आहे. उपरोक्त घटकांपैकी ज्या बाबी “शेतकरी गट / एफ.पी.ओ. /संस्था” यांना लागू असतील त्याकरिता ते अर्ज करू शकतील. महा-डीबीटी पोर्टलवर “वैयक्तिक शेतकरी” आणि “शेतकरी गट / एफ.पी.ओ. /संस्था” यांनी अर्ज सादर केल्यानंतर त्यावरील पुढील प्रक्रियेची कार्यपद्धती एकसमान असून त्याचा तपशील पुढील परिच्छेदांमध्ये नमूद केलेला आहे.

**४.४. अर्ज शुल्क:**

अर्ज सादर करतेवेळी शेतकऱ्यांनी रु. २०/- शुल्क व रु. ३.६०/- जी.एस.टी. मिळून एकूण रु.२३.६०/- शुल्क ऑनलाईन भरावयाचे आहे तदनंतर, महा-आयटी महामंडळाकडे शेतकऱ्यांचा अर्ज पुढील प्रक्रियेकरिता पाठविला जाईल. अर्ज सादर करण्याच्या अंतिम मुदतीपर्यंत शेतकऱ्यांना अर्जात निवडलेल्या बाबींमध्ये विना शुल्क बदल करता येतील (नवीन बाबींचा अर्जात समावेश करणे अथवा अर्जात समाविष्ट केलेल्या बाबी वगळणे) परंतु, मुदत संपल्यानंतर त्यात बदल करता येणार नाही.

**४.५. एकत्रित संगणकीय सोडत:**

महा-डीबीटी पोर्टलवर कृषि विभागाने विकसित केलेल्या प्रणालीद्वारे शेतकऱ्यांचा कोणत्याही विशिष्ट योजनेस अर्ज घेण्यात येत नसून तो शेती निगडीत विविध बाबींसाठी घेण्यात येत आहे आणि त्या बाबींकरिता कोणत्या योजनेतून लाभ देता येईल याबाबत संगणकीय प्रणाली एकत्रित सोडतीमध्ये निर्णय घेईल. महा-डीबीटी पोर्टलद्वारे कृषि विभागाच्या सर्व योजनांसाठी तालुका स्तरावर एकत्रित संगणकीय सोडत काढण्यात येणार आहे, त्यामुळे शेतकऱ्यांना प्रत्येक योजनेसाठी स्वतंत्र अर्ज करण्याची आवश्यकता नसून त्यांनी अर्ज केलेल्या बाबी ज्या-ज्या योजनेतून उपलब्ध असतील त्या सर्व योजनांसाठी अर्जाचा विचार केला जाईल.

शेतकऱ्यांनी (वैयक्तिक शेतकरी व गट / FPOs) अर्ज केलेल्या विविध बाबींची तालुका स्तरावर एकत्रित संगणकीय सोडत काढण्यात येईल तथापि, ज्या घटकांसाठी / प्रवर्गासाठी तालुका स्तरावर पुरेसा आर्थिक लक्षांक उपलब्ध होणार नाही त्यासाठी जिल्हा स्तरावर संगणकीय सोडत काढण्यात येईल.

संगणकीय सोडतीत निवड झालेल्या शेतकऱ्यांना त्यांच्या मोबाईल क्रमांकावर लघु संदेशाद्वारे (SMS) त्यांच्या निवडीबाबत अवगत करण्यात येईल, आणि सदर सोडतीमध्ये ज्या शेतकऱ्यांची निवड झाली नसेल त्यांना प्रतीक्षा यादीत क्रमवारीनुसार ठेवण्यात येईल. शेतकऱ्यांचे अर्ज घटक / बाब निहाय घेण्यात येत असून संगणकीय सोडत प्रक्रियेद्वारे शेतकऱ्यांना त्यांच्या अर्जातील बाबी विविध प्रचलित योजनेतून मंजूर करण्यात येतील.

**४.६. कागदपत्रे सादर करणे:**

संगणकीय सोडतीत निवड झालेल्या शेतकऱ्यांना (वैयक्तिक शेतकरी व गट / FPOs) त्यांची ज्या बाबीसाठी व ज्या योजनेंतर्गत निवड झाली असेल त्यासंबंधीची आवश्यक कागदपत्रे

महा-डीबीटी पोर्टलवर सादर (Upload) करण्याबाबत त्यांच्या मोबाईल क्रमांकावर लघु संदेशाद्वारे (SMS) कळविण्यात येईल. शेतकऱ्यांनी सदर कागदपत्रे महा-डीबीटी पोर्टलवर विहित मुदतीत सादर (Upload) करावयाची आहेत, जे शेतकरी विहित मुदतीत कागदपत्रे सादर करणार नाहीत त्यांची निवड रद्द करण्यात येईल. ही प्रक्रिया पूर्णतः ऑनलाईन केली असल्यामुळे लघु संदेशाद्वारे मागविलेल्या कागदपत्रांशिवाय कोणत्याही इतर कागदपत्रांची शेतकऱ्यांकडे मागणी करण्यात येऊ नये.

**४.७. शेतकऱ्यांच्या अर्जाची / कागदपत्राची छाननी व पूर्व-संमती प्रदान करणे:**

संगणकीय सोडतीत ज्या योजनेंतर्गत शेतकऱ्यांची (वैयक्तिक शेतकरी व गट / FPOs) निवड झालेली असेल त्या योजनेकरिता कृषि विभागाने निश्चित केलेल्या बहुस्तरीय पद्धतीने अर्जाची व कागदपत्रांची छाननी करण्यात येईल व छाननी अंती पात्र ठरलेल्या शेतकऱ्यांना पूर्व-संमती आदेश ऑनलाईन निर्गमित करण्यात येतील, तसेच SMS व्दारे सूचना देण्यात येईल. सदर आदेश शेतकऱ्यांना त्यांच्या महा-डीबीटी पोर्टलवरील खात्यामध्ये (लॉगीन) उपलब्ध होतील. पूर्व-संमती आदेश मिळालेल्या शेतकऱ्यांपैकी जे शेतकरी त्यांना मंजूर केलेल्या बाबींची विहित कालावधीत अंमलबजावणी करणार नाहीत त्यांची पूर्वसंमती रद्द करण्यात येईल व प्रतीक्षा यादीतील क्रमवारीनुसार पात्र ठरणाऱ्या शेतकऱ्यांची निवड करण्यात येईल व संबंधितांना त्याप्रमाणे अवगत करण्यात येईल.

**४.८. देयक सादर करणे, मोका तपासणी, मापन पुस्तिकेत नोंदी घेणे (MB Recording) आणि भौगोलिक स्थान निश्चिती (जिओ-टॅगिंग):**

कृषि विभागाने पूर्व-संमती आदेशाद्वारे मंजूर केलेल्या बाबीची शेतकऱ्यांनी (वैयक्तिक शेतकरी व गट / FPOs) विहित कालावधीत अंमलबजावणी करणे बंधनकारक असेल. मंजूर केलेल्या बाबींपैकी ज्या बाबींची खरेदी करावयाची असेल अथवा शेतावर उभारणी / स्थापना करावयाची असेल, त्या बाबींची शेतकऱ्यांनी बाजारपेठेतून आपल्या पसंतीच्या उत्पादकाच्या अधिकृत विक्रेत्यामार्फत खरेदी करावी व देयकाची (जी.एस.टी. क्रमांकासह) छायांकित प्रत (Scan Copy) महा-डीबीटी पोर्टलवर सादर (Upload) करावी. यांत्रिकीकरण योजनेच्या बाबतीत खरेदी करण्यात येणारे यंत्र अवजारे मान्यता प्राप्त यादीमधील असल्याची खात्री करावी. शेतकऱ्यांनी देयकाची प्रत महा-डीबीटी पोर्टलवर सादर (Upload) केल्यानंतर कृषि विभागाचे संबंधित अधिकारी / कर्मचारी लाभार्थी शेतकऱ्याच्या शेतास भेट देऊन खरेदी केलेल्या अथवा उभारणी / स्थापना केलेल्या बाबीची प्रत्यक्ष मोका तपासणी करतील. ते देयकाची मूळ प्रत व आवश्यक असल्यास काही दस्तऐवजांच्या मूळ प्रती देखील तपासतील, संबंधित मालमत्तेचे भौगोलिक स्थान निश्चिती (जिओ-टॅगिंग) करतील आणि त्यांचा मोका तपासणी अहवाल महा-डीबीटी पोर्टलवर सादर करतील.

त्याचप्रमाणे, ज्या बाबींची (उदा. शेत तळे, फळबाग लागवड, विहीर बांधकाम इ.) मापन पुस्तिकेत नोंद घ्यावयाची असेल त्या बाबींच्या कामाचा प्रत्येक टप्पा पूर्ण झाल्यानंतर कृषि

विभागाचे संबंधित अधिकारी / कर्मचारी वेळोवेळी लाभार्थी शेतकऱ्याच्या (वैयक्तिक शेतकरी व गट / FPOs) शेतास भेट देऊन मापन पुस्तिकेत नोंद घेतील. सदर महा-डीबीटी पोर्टलवर पुढील कार्यवाहीसाठी सादर केल्या जातील. कृषि विभागाच्या विविध बाबींच्या मोका-तपासणी तसेच, मापन पुस्तिकेत नोंदी घेण्याचे कामकाज मोबाईल ॲप्लिकेशनद्वारे करण्याचे नियोजित असून ते विकसित झाल्यानंतर उपलब्ध करून दिले जाईल.

**४.९. लाभार्थी शेतकऱ्यांना अनुदान वितरण:**

परिच्छेद क्र. ४.८ मधील नमूद कार्यवाही पूर्ण झाल्यानंतर, यथास्थिती मोका-तपासणी अहवाल अथवा मापन पुस्तिकेतील नोंदींची कृषि विभागाने निश्चित केलेल्या बहुस्तरीय पद्धतीने छाननी करण्यात येईल व छाननी अंती लाभार्थी शेतकऱ्यांना अनुदान वितरणाची शिफारस क्षेत्रीय स्तरावरील यंत्रणेकडून केली जाईल. संदर्भांकित शासन निर्णय दिनांक १२/१०/२०१८ अन्वये विहित केलेल्या कार्यपद्धती नुसार राज्य स्तरावरून (कृषि आयुक्तालय) केंद्रीय पद्धतीने लाभार्थी शेतकऱ्यांच्या आधार क्रमांकाच्या आधारे त्यांच्या बँक खात्यात अनुदान जमा करण्यात येईल. सबब, अनुदान जमा करतेवेळी शेतकऱ्याचा आधार क्रमांक त्यांच्या ज्या बँक खात्याशी संलग्न असेल त्या खात्यावर अनुदानाची रक्कम जमा होईल. कृषि आयुक्तालय स्तरावरून प्रत्येक राज्यस्तरीय योजनेचे देयक कोषागारास पाठविणे व कोषागाराने उपलब्ध करून दिलेल्या निधीचे लाभार्थ्यांना अनुदान वितरण करण्याची जबाबदारी सहाय्यक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, यांची राहील, जिल्हा स्तरीय योजनांच्या अनुदान वितरणाच्या कार्यपद्धतीबाबत स्वतंत्र सूचना निर्गमित करण्यात येतील.

**४.१०. लघु संदेश (एस.एम.एस.) सुविधा:**

लाभार्थी शेतकऱ्यांना अर्ज करतेवेळी तसेच, अर्जावर पुढील कार्यवाही करण्याच्या प्रत्येक टप्प्यावर त्यांच्या मोबाईल क्रमांकावर लघु संदेशाद्वारे वेळोवेळी सूचना देण्यात येतील.

**४.११.तक्रार / सूचना:**

शेतकऱ्यांना अर्ज करतेवेळी काही अडचणी येत असतील अथवा काही सूचना करावयाची असल्यास ते महा-डीबीटी पोर्टल वरील “तक्रार / सूचना” या बटनवर क्लिक करून आपल्या तक्रारीचा / सूचनेचा तपशील सादर करू शकतील.

**५. कृषि विभागाच्या अधिकारी / कर्मचाऱ्यांसाठी महा-डीबीटी पोर्टलवरील सुविधा:**

प्रथम टप्प्यात कृषि विभागाच्या १३ योजनांची महा-डीबीटी पोर्टलद्वारे अंमलबजावणी करण्यात येणार आहे आणि टप्प्या-टप्प्याने उर्वरित योजनांचा या पोर्टलवर समावेश करण्यात येणार आहे. अशाप्रकारे, यापुढे विविध योजनांच्या अंमलबजावणीचे कामकाज पूर्णतः ऑनलाईन करण्यात येणार आहे (अर्ज करण्यापासून लाभार्थ्यांना अनुदानाचा प्रत्यक्ष लाभ मिळेपर्यंत), त्याकरिता कृषि विभागाच्या अधिकारी / कर्मचाऱ्यांसाठी पुढील सुविधा देण्यात आल्या आहेत.

**५.१. कृषि विभागाच्या अधिकारी / कर्मचाऱ्यांसाठी लॉगीन आय. डी. व पासवर्ड:**

विविध योजनांच्या अंमलबजावणीशी निगडीत असलेल्या कृषि विभागाच्या संबंधित क्षेत्रीय अधिकारी / कर्मचाऱ्यांना महा-डीबीटी पोर्टलवर योजनांच्या अंमलबजावणीचे कामकाज करण्याकरिता लॉगीन आय. डी. व पासवर्ड उपलब्ध करून दिला जाईल. सर्व संबंधित अधिकारी / कर्मचाऱ्यांनी http://AgriDBTworkflow.mahaonline.gov.in या वेब लिंक वर जाऊन लॉगीन करावे व आपला आधार क्रमांक प्रमाणित करुन घ्यावा तसेच आपला पासवर्ड बदलून घ्यावा. त्याचप्रमाणे, कार्यालयीन कामकाजाच्या दृष्टिने अधिकारी / कर्मचाऱ्यांशी संपर्क साधण्यासाठी तसेच, त्यांना वेळोवेळी संदेश / दिशानिर्देश देण्याकरिता सर्व अधिकारी / कर्मचाऱ्यांना शासकीय ई-मेल आय.डी. उपलब्ध करून देण्याबाबत आयुक्त (कृषि) यांनी तातडीने कार्यवाही करावी.

**५.२. योजनांच्या वित्तीय लक्षांकाचे व्यवस्थापन :**

योजनांच्या वित्तीय लक्षांकाच्या वित्तीय व्यवस्थापनाचे कामकाज कृषि आयुक्तालयाच्या स्तरावरून करण्यात यावे. कृषि विभागाच्या विविध योजनांकरिता प्रतिवर्ष प्राप्त होणारा वित्तीय लक्षांक महा-डीबीटी पोर्टलवर भरणे, त्यांचे जिल्हा / तालुका निहाय व प्रवर्ग निहाय (सर्वसाधारण, अनु. जाती व जमाती, महिला, दिव्यांग इ.) वितरण करणे, आवश्यकतेनुसार त्याचे फेरवितरण करणे इ. कामांसाठी तसेच, सर्व योजनांच्या वित्तीय लक्षांकाचे महा-डीबीटी पोर्टलवर व्यवस्थापन करण्यासाठी विविध सुविधा उपलब्ध करून देण्यात आल्या आहेत. त्याबाबत, सविस्तर माहिती User Manual द्वारे उपलब्ध करून देण्यात येईल. आयुक्त (कृषि) यांनी प्रत्येक योजनेसाठी आयुक्तालयातील संबंधित कृषि उप संचालकांना योजना व्यवस्थापक (Scheme Manager) म्हणून घोषित करावे व त्यांना योजनांच्या वित्तीय लक्षांकाच्या व्यवस्थापनाची जबाबदारी द्यावी.

**५.३. अर्जांची छानननी व मंजुरी:**

महा-डीबीटी पोर्टलवर कृषि विभागाच्या विविध योजनांतर्गत लाभ घेण्यासाठी प्राप्त होणाऱ्या अर्जांची छाननी बहुस्तरीय पद्धतीने करण्यात येणार असून त्याकरिता महा-डीबीटी पोर्टलवर विविध टप्पे (डेस्क) निर्माण केलेले आहेत. लाभार्थी शेतकऱ्यांच्या अर्जांची वेगवेगळया टप्प्यावर छाननी करावयाची असून त्याबाबतची कार्यपध्दती User Manual मध्ये तपशीलवार नमूद केलेली असून http://AgriDBTworkflow.mahaonline.gov.in या लिंक वर User Manual उपलब्ध करुन देण्यात आले आहे. प्राप्त अर्ज व कागदपत्रांची प्रत्येक डेस्कद्वारे पडताळणी करून पात्र शेतकऱ्यांना पूर्व-संमती आदेश निर्गमित करणे, प्रशासकीय / तांत्रिक मंजुरी आदेश जोडणे, शेतकऱ्यांनी सादर केलेल्या देयकांची तपासणी करणे, क्षेत्र भेटीद्वारे झालेल्या कामाची प्रत्यक्ष मोका तपासणी करणे अथवा मोजमापे घेऊन त्याची मापन पुस्तिकेत नोंदी घेणे व शेतावरील मालमत्तेचे भौगोलिक स्थान निश्चिती करून (जिओ-टॅगिंग) झालेल्या कामाचा अहवाल सादर करणे, पात्र लाभार्थी शेतकऱ्यांना अनुदान वितरणाची शिफारस करणे इ. कामे

करण्यात येणार आहेत. त्याकरिता प्रत्येक योजनेच्या अंमलबजावणीशी निगडीत असलेल्या क्षेत्रीय अधिकारी / कर्मचाऱ्यांना उपलब्ध करून देण्यात येणाऱ्या लॉगीन आय. डी. व पासवर्ड द्वारे महा-डीबीटी पोर्टलवर येऊन आपल्या लॉगीनला प्राप्त झालेल्या अर्जांचा निपटारा करावयाचा आहे. त्याचप्रमाणे, ज्या बाबींकरिता कृषि विभागाच्या अधिकारी / कर्मचाऱ्यांनी प्रशासकीय व तांत्रिक मान्यतेचे आदेश अथवा स्थळ पाहणी अहवाल अथवा अन्य आदेश अर्जासोबत जोडणे आवश्यक असल्यास ते जोडण्याची सोय महा-डीबीटी पोर्टलवर उपलब्ध करून देण्यात आली आहे. प्रत्येक डेस्कवर येणाऱ्या अर्जाचा निपटारा करण्याबाबत महा-डीबीटी पोर्टलवर विशिष्ट कालावधी विहित करण्यात येईल (SLA), सर्व अधिकारी / कर्मचाऱ्यांनी या कालावधीत अर्जांचा निपटारा करणे आवश्यक राहील.

६. महा-डीबीटी पोर्टलशी निगडीत कामाचे विभागांतर्गत समन्वय करणे, विभागाच्या अधिकारी-कर्मचाऱ्यांच्या अडचणी सोडविणे व त्यांना प्रशिक्षण देणे, शेतकऱ्यांच्या तक्रार निवारणासाठी मदत कक्ष (Help Desk) स्थापणे इ. अनुषंगिक बाबींचे नियोजन करावे व त्याकरिता आयुक्त (कृषि) यांनी कृषि आयुक्तालय स्तरावर पूर्णवेळ व्यवस्था निर्माण करावी.

७. कृषि विभागाच्या उर्वरित योजना तसेच, भविष्यात येणाऱ्या नवीन योजना पोर्टलवर आणून त्यांची अंमलबजावणी करण्याकरिता कृषि आयुक्तालय स्तरावर समन्वय अधिकाऱ्याची नियुक्ती करण्यात यावी. ‘महा-डीबीटी समन्वय अधिकाऱ्यांनी’ कृषि आयुक्तालयाच्या वतीने महा-आयटी महामंडळाशी नियमित संपर्कात राहून नवीन योजनांसाठी प्रणाली विकसित करण्याच्या दृष्टिने योजनांविषयक माहिती उपलब्ध करून देऊन प्रत्येक योजनेकरिता प्रणाली विकसित करून घ्यावी. त्याचप्रमाणे, सद्यस्थितीत विकसित करण्यात आलेल्या प्रणालीचे मूल्यवर्धन करावे व या प्रणालीमध्ये आवश्यकतेनुसार अधिक सुविधा उपलब्ध करून द्याव्यात आणि शासनाशी समन्वय ठेवून महा-डीबीटी प्रणालीचे राज्य स्तरावरून संनियंत्रण करावे.

८. उन्नत शेती-समृद्ध शेतकरी अभियानांतर्गत तालुका हा कृषि नियोजनाचा व विकासाचा घटक निश्चीत केलेला आहे. त्यामुळे प्रत्येक योजनेतील सर्व घटकांतर्गत विविध बाबींसाठी प्रत्येक तालुक्यास समन्यायी पद्धतीने आर्थिक लक्षांक आयुक्त (कृषि) यांनी उपलब्ध करून द्यावा. सदर आर्थिक लक्षांकाची माहिती महा-डीबीटी पोर्टलवर योजना / प्रवर्ग / तालुका निहाय भरावी आणि प्रत्येक योजनेसाठी विहित केलेल्या लक्षांकाच्या मर्यादेत एकत्रित संगणकीय सोडत प्रक्रियेद्वारे लाभार्थ्यांची निवड करावी. ज्या योजनेंतर्गत विशिष्ट घटकासाठी, बाबीसाठी अथवा प्रवर्गासाठी तालुका स्तरावर पुरेसा आर्थिक लक्षांक देणे शक्य नसेल त्या करिता जिल्हा स्तरावर लक्षांक विहित करण्यात यावा, तो महा-डीबीटी पोर्टलवर भरावा आणि एकत्रित संगणकीय सोडत प्रक्रियेद्वारे संबंधित जिल्ह्यातील लाभार्थ्यांची निवड करण्यात यावी.

९. कृषि विभागाच्या विविध योजनांसाठी महा-डीबीटी पोर्टलद्वारे वर्षभर (२४ X ७) अर्ज स्वीकारले जातील व योजनांसाठी आर्थिक लक्षांकाच्या उपलब्धतेनुसार प्राप्त अर्जांची संगणकीय सोडत काढून लाभार्थी शेतकऱ्यांची निवड करण्यात येईल. आयुक्त (कृषि) यांनी सोडत काढण्यापूर्वी ३०

दिवस अगोदर राज्य स्तरावरून वर्तमानपत्रात जाहिरात प्रसिद्ध करून शेतकऱ्यांना कृषि विभागाच्या विविध योजनांसाठी महा-डीबीटी पोर्टलवर अर्ज करण्याचे आवाहन करावे. तदनंतर संगणकीय प्रणालीद्वारे सर्व योजनांसाठी एकत्रित सोडत काढावी आणि प्रत्येक तालुका / जिल्ह्यातील निवड झालेल्या लाभार्थ्यांची यादी व प्रतीक्षाधीन शेतकऱ्यांची यादी (क्रमवारीनुसार) योजना व प्रवर्ग निहाय पोर्टलवर प्रसिद्ध करावी.

१०. एकत्रित सोडत प्रक्रीयेनंतर काही योजनांसाठी कमी अर्ज प्राप्त झाल्यामुळे तालुका / जिल्हा स्तरावर आर्थिक लक्षांक शिल्लक राहिल्यास, जिल्हा स्तरावरून तत्काळ जाहिरात देऊन पुनःश्च अर्ज मागविण्यात यावेत व नव्याने प्राप्त होणाऱ्या अर्जांसाठी पुन्हा एकत्रित संगणकीय सोडत प्रक्रिया राबवून संबंधित तालुका / जिल्ह्यातील लाभार्थी निवडावेत. यानंतरही आर्थिक लक्षांक शिल्लक राहिल्यास, संबंधित योजनेंतर्गत अतिरिक्त निधीची मागणी असलेल्या तालुका / जिल्हा / विभागास निधीचे फेरवितरण करण्याबाबत यथास्थिती जिल्हा / विभाग आणि राज्य स्तरावरून (कृषि आयुक्तालय) यथोचित निर्णय घेण्यात यावेत, जेणेकरून तेथील प्रतीक्षाधीन यादीतील पात्र ठरणाऱ्या शेतकऱ्यांना लाभ देता येईल.

११. योजनेंतर्गत आर्थिक लक्षांकाचे फेरवितरण करतेवेळी प्रचलित कार्यपद्धतीनुसार, प्रथमतः तालुका स्तरावर अतिरिक्त ठरलेल्या लक्षांकाचे जिल्हा अधिक्षक कृषि अधिकाऱ्यांनी जिल्ह्यांतर्गत निधीची मागणी असलेल्या अन्य तालुक्यांना मागणीच्या प्रमाणात फेरवितरण करावे. जिल्हा स्तरावर अतिरिक्त ठरलेल्या लक्षांकाचे विभागातील अन्य जिल्ह्यातील निधीची मागणी असलेल्या तालुक्यांना विभागीय कृषि सहसंचालकांनी मागणीच्या प्रमाणात फेरवितरण करावे. विभाग स्तरावर अतिरिक्त ठरलेल्या लक्षांकाचे अतिरिक्त निधीची मागणी असलेल्या राज्यातील तालुका / जिल्ह्यांना कृषि आयुक्तालय स्तरावरून मागणीच्या प्रमाणात फेरवितरण करावे

१२. ज्या लाभार्थ्यांची कोणत्याही योजनेत निवड न होता ते त्या आर्थिक वर्षात प्रतीक्षा यादीत राहतील आणि ते पुढील वर्षी देखील त्याच बाबीसाठी लाभ घेऊ इच्छित असल्यास त्यांनी महा-डीबीटी पोर्टलवर त्यांचा मागील वर्षाचा अर्ज ग्राह्य धरण्याचा पर्याय निवडावा, त्याकरिता त्यांच्याकडून पुन्हा रु. २३.६०/- शुल्क आकारले जाणार नाही.

१३. संदर्भांकित शासन निर्णय दिनांक १२/१०/२०१८ अन्वये विहित केलेल्या कार्यपद्धती नुसार, राज्य स्तरावरून (कृषि आयुक्तालय) महा-डीबीटी पोर्टलद्वारे विविध योजनांचा निधी केंद्रीय पद्धतीने लाभार्थ्यांना वितरीत करण्याकरिता कोषागारातून प्रत्येक योजनेसाठी प्राप्त होणारा निधी प्रथमतः त्या योजनेच्या PFMS प्रणालीशी संलग्नित बँक खात्यात जमा करणे व नंतर तो लाभार्थ्यांना वितरीत करण्यासाठी पुल खात्यावर (Pool Account) जमा करणे आवश्यक आहे. या शासन निर्णयाच्या परिच्छेद क्र. २ मधील तक्त्यातील अनुक्रमांक ii, iv व ix येथे नमूद केलेल्या योजना १००% राज्य पुरस्कृत योजना असून त्याकरिता PFMS प्रणालीशी संलग्नित बँक खाते उघडण्यास वित्त विभागाने अनौ. संदर्भ क्र. २१९/२०२०/कोषा प्रशा-५, दिनांक ०७ /१०/२०२० अन्वये मान्यता दिली असून आयुक्त (कृषि) यांनी या योजनांसाठी तत्काळ PFMS प्रणालीशी संलग्नित बँक खाते

उघडण्याची कार्यवाही पूर्ण करावी. त्याचप्रमाणे, परिच्छेद क्र. २ मधील तक्त्यातील अनु. क्र. x, xi व xii या जिल्हा स्तरीय (DPDC) योजना असल्यामुळे या योजनांबाबत करावयाच्या कार्यवाहीचे आदेश नियोजन विभाग, सामाजिक न्याय विभाग, आदिवासी विकास विभाग व वित्त विभागाच्या सहमतीने स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येतील.

१४. कृषि विभागासाठी महा-डीबीटी प्रणाली राज्य शासनाच्या महा-आयटी महामंडळाकडून विकसीत करण्यात आली आहे. या प्रणालीमध्ये कृषि विभागाच्या आवश्यकतेनुसार वेळोवेळी बदल / सुधारणा करणे तसेच, नवीन योजना अथवा नवीन घटकांचा सध्याच्या प्रणालीमध्ये अंतर्भाव करणे, महा-डीबीटी पोर्टलच्या वापरादरम्यान येणाऱ्या समस्यांचा (Bug fixing & any Runtime issues etc.) वेळेत निपटारा करणे, सदर प्रणालीचे सिक्युरिटी ऑडीट करुन घेणे, शासनाने वेळोवेळी विहीत केलेल्या संगणकीय प्रोटोकॉल व स्टॅन्डर्स नुसार पोर्टल अद्ययावत ठेवणे इ. संगणकीय प्रणाली विषयक आवश्यक मानकांची पूर्तता करण्याची जबाबदारी महा-आयटी महामंडळाची असेल.

१५. महा-आयटी महामंडळाने कृषि विभागाशी नियमित संपर्कात राहुन कृषि विभागाच्या आवश्यकतेनुसार सदर प्रणालीचे मुल्यवर्धन करावे. त्याचप्रमाणे सदर प्रणालीमध्ये वरचेवर केल्या जाणाऱ्या सुधारणांच्या अनुषंगाने User Manual व प्रशिक्षण साहित्य विभागास उपलब्ध करुन द्यावे. महा-आयटी महामंडळाने शेतकऱ्यांकडून येणाऱ्या तक्रारींच्या निवारणासाठी तसेच कृषि विभागाच्या अधिकारी / कर्मचाऱ्यांना पोर्टलच्या वापराविषयी येणाऱ्या अडीअडचणी वेळेत सोडवण्यासाठी महामंडळा अंतर्गत मदत कक्ष (Help Desk) स्थापन करावा.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२०११०४१२१०५३६१०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Shrikant Chandrakant Andge

Digitally signed by Shrikant Chandrakant Andge
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture and ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5d5ab93b4e4f2fcd87e12fe19b8965025d482b1bee0fffaa62085c34db6bfd8c, serialNumber=d8d9626c9e038380cd235c048f20d7ce74cffd3a95f2ac3c192e9c991f358271, cn=Shrikant Chandrakant Andge
Date: 2020.11.04 15:40:47 +05'30'

**(श्रीकांत आंडगे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१. मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई,
२. मा. मंत्री (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई,
३. मा. राज्यमंत्री (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
५. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
६. अपर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. प्रधान सचिव (माहिती व तंत्रज्ञान), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई

८. प्रधान सचिव (सामाजिक न्याय), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई,
१०. प्रकल्प संचालक, नानाजी देशमुख कृषि संजीवनी प्रकल्प, मुंबई
११. सचिव (आदिवासी विकास विभाग), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१२. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, पुणे
१३. व्यवस्थापकीय संचालक (महाआयटी), महा आयटी, अपीजय हाऊस, मुंबई.
१४. संचालक, माहिती व तंत्रज्ञान संचालनालय, मंत्रालय, मुंबई
१५. जिल्हाधिकारी (सर्व)
१६. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
१७. कृषि संचालक (सर्व), कृषि आयुक्तालय, पुणे
१८. सह सचिव /उप सचिव/आवर सचिव/कक्ष अधिकारी, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई (सर्व)
१९. सीओओ, महा आयटी, अपीजय हाऊस, मुंबई
२०. विभागीय कृषि सहसंचालक. (सर्व)
२१. जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी (सर्व)
२२. उप विभागीय कृषि अधिकारी (सर्व)
२३. कृषि विकास अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
२४. गट विकास अधिकारी, पंचायत समिती (सर्व)
२५. तालुका कृषि अधिकारी (सर्व)
२६. महालेखापाल, महाराष्ट्र १ / २ (लेखापरिक्षा / लेखा व अनुज्ञेयता) मुंबई / नागपूर,
२७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
२८. जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व)
२९. निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई,
३०. निवड नस्ती